पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजनेअंतर्गत
अटी शर्तीची सुधारणा करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. शिष्यवृ-१५२२/प्र.क्र.८७/का-१२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दि. १५ मे, २०२३.

**वाचा -:**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२, दि.१५.१०.२०१६.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२, दि.२७.११.२०१८.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. आवगृ-२०१६/प्र.क्र.८७/का-१२, दि.१६.०९.२०१९.

**प्रस्तावना :-**

सन २०१६-१७ या शैक्षणिक वर्षापासून इ. १२ वी नंतरच्या अभ्यासक्रमास प्रवेश घेतलेल्या परंतु शासकीय वसतीगृहामध्ये प्रवेश न मिळालेल्या एकूण २०,००० संख्येच्या मर्यादेत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भोजन, निवास व इतर शैक्षणिक साहित्य उपलब्ध करुन घेण्यासाठी तालुकास्तर, जिल्हास्तर, विभागीयस्तर व मोठ्या शहरामध्ये शिक्षण घेत असलेल्या विद्यार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यामध्ये देय असलेली रक्कम थेट जमा करण्याबाबत "पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजना" सुरू करण्यात आलेली आहे.

वाचा मधील क्र.१ च्या शासन निर्णयातील क) इतर निकषातील मुद्दा क्र.३ नुसार पंडीत दिनदयाळ उपाध्याय स्वयंम योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थ्यांचे कमाल वय २८ वर्षापेक्षा अधिक नसावे अशी तरतूद आहे. सदर तरतूदीमध्ये सुधारणा करुन सदर वयोमर्यादा ३० करण्याबाबतची मागणी विविध स्तरावरुन करण्यात येत होती. सदर मागणीच्या अनुषंगाने पंडीत दिनदयाळ उपाध्याय स्वयंम योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थ्यांचे कमाल वय ३० वर्ष करण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. पंडीत दिनदयाळ उपाध्याय स्वयंम योजनेचा लाभ घेण्यासाठी विद्यार्थ्यांचे कमाल वय ३० वर्षापेक्षा अधिक नसावे. या बदलास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.
२. याव्यतिरिक्त वाचा १, २ व ३ येथील शासन निर्णयातील उर्वरित अटी व शर्ती पुर्वीप्रमाणेच राहतील.
३. उपरोक्त सुधारणांच्या अनुषंगाने सद्यस्थितीत कार्यरत संगणकीय प्रणालीमध्ये सुधारणा करण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०५१५१६३६५८७६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

UDAY GANPAT GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.05.15 16:37:52 +05'30'

**(उदय गवस)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग, यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
४. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. मुख्य सचिव, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर..
७. महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर.
८. अप्पर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, शालेय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२.प्रधान सचिव, कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय व मत्स्यविकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. कुलगुरु, सर्व विद्यापीठे.
१५. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
१६. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१७. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१८. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे, नाशिक, नागपुर, अमरावती.
१९. सर्व उप सचिव / अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
२१. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
२२. निवड नस्ती (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.